**राज्यातील शासकीय, निमशासकीय कार्यालये,मंडळे महामंडळे यांना बायोमेट्रीक उपस्थिती प्रणाली लागू करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक मातंसं-2009/924/39,**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**मंत्रालय, मुंबई 400 032**
**दि. २७ ऑक्टोबर, 2010**

वाचाः- 1) शासन परिपत्रक क्र. मातंसं-2009/924/39, दि. 7 जुलै, 2009
2) शासन निर्णय क्र मातंसं/नस्ती क्र.2010/प्र.क्र.39, दि. 18 जून 2010

**प्रस्तावनाः-** प्रभावी व लोकाभिमुख प्रशासन व कार्यालयीन वक्तशीरपणा शासकीय, निमशासकीय कार्यालये, शासनाच्या नियंत्रणाखालील मंडळे, महामंडळे यात जोपासला जावा या उद्देशाने शासकीय, निमशासकीय कार्यालये, महामंडळातील अधिकारी/कर्मचा-यांची कार्यालयीन उपस्थिती नोंदविण्यासाठी बायोमेट्रीक पध्दतीचा अवलंब करण्याच्या सूचना संदर्भाधिन क्र (1) येथील परिपत्रकान्वये यापूर्वीच देण्यात आलेल्या आहेत. तसेच मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील क्षेत्रीय कार्यालयांनी आपल्या कामकाजात ई-गव्हर्नन्सचा जास्तीत जास्त वापर करावा त्यासाठी प्रत्येक मंत्रालयीन विभागाने त्यांच्या एकूण उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतुदीच्या (Budgeted Plan & Non Plan) 0.5 टक्के इतका निधी ई-गव्हर्नन्ससाठी सन 2010-11 या वित्तीय वर्षापासून खर्च करावा अशा सूचना संदर्भाधिन क्र. (2) वरील शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत.

**शासन निर्णय -** राज्यातील शासकीय, निमशासकीय कार्यालये, मंडळ, महामंडळ यांनी अधिकारी / कर्मचारी यांची कार्यालयीन उपस्थिती बायोमेट्रीक पद्धतीने नोंदविण्यासाठी आवश्यक ती यंत्रणा कार्यान्वित करण्याची कार्यवाही दि. 31 मार्च 2011 पर्यंत पूर्ण करावी.

२. बायोमेट्रीक पध्दत लागू करण्यासाठी निधी उपलब्ध नसल्यास, ई-गव्हर्नन्स साठी राखून ठेवलेल्या 0.5टक्के निधीतून करण्यात यावी.

३. वरील कालमर्यादेत आपल्या नियंत्रणाखालील क्षेत्रीय कार्यालयांमध्ये बायोमेट्रीक पध्दत लागू करण्याची कार्यवाही करण्याच्या सूचना या शासन निर्णयान्वये सर्व मंत्रालयीन विभागांना देण्यात येत आहेत. मंत्रालयीन विभागांनी त्याप्रमाणे कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. त्याचा संगणक संकेतांक 201010271740O1001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(डॉ. संतोष भोगले)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

सर्व विधान सभा सदस्य/ विधान परिषद सदस्य
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी/सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
*सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, (विधान परिषद/विधान सभा),मुंबई
महालेखापाल-1(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-1(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-1(लेखा व परीक्षा),महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-1(लेखा व परीक्षा),महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/लेखाकोष भवन,वांद्रे (पूर्व),मुंबई - 51
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
निवड नस्ती (2 प्रती)

* स्वतंत्र पत्राद्वारे